**धर्मादाय रुग्णालयातील आरक्षित खाटा निर्धन व दुर्बल घटकांतील रुग्णांसाठी उपलब्ध करून देण्याबाबतच्या योजनेच्या प्रभावी अंमलबजावणीसाठी सूचना निर्गमित करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**विधि व न्याय विभाग**
**शासन परिपत्रक क्रमांकः बैठक ४४२५/ प्र.क्र.३४/का.१५,**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
दिनांक: १० जून, २०२५

**<u>प्रस्तावना -</u>**

धर्मादाय रुग्णालय मदत कक्षासंदर्भात आढावा घेण्यासाठी मा. मुख्यमंत्री यांच्या अध्यक्षतेखाली दिनांक २३/०४/२०२५ रोजी बैठक आयोजित करण्यात आली होती. सदर बैठकीत घेण्यात आलेल्या निर्णयाच्या अनुषंगाने सूचना निर्गमित करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**<u>शासन परिपत्रक :-</u>**

धर्मादाय रुग्णालयांकडून निर्धन व आर्थिक दृष्टया दुर्बल घटकांतील रुग्णांसाठी खाटा आरक्षित ठेवण्याबाबतच्या योजनेच्या अंमलबजावणीवर देखरेख व नियंत्रणासाठी धर्मादाय आयुक्त, वैद्यकीय शिक्षण व औषधी द्रव्ये विभाग आणि धर्मादाय रुग्णालय मदत कक्ष यांच्या समन्वयातून विशेष तपासणी पथक स्थापन करण्यास मान्यता देण्यात येत आहे. सदर तपासणी पथकामध्ये १) धर्मादाय आयुक्त, महाराष्ट्र राज्य किंवा त्यांनी नियुक्त केलेले सदस्य २) प्रधान सचिव, वैद्यकीय शिक्षण व औषधी द्रव्ये विभाग किंवा त्यांनी नियुक्त केलेले सदस्य ३) कक्ष प्रमुख, धर्मादाय रुग्णालय मदत कक्ष किंवा त्यांनी नियुक्त केलेले सदस्य यांची नियुक्ती करण्यात येत आहे.

२. धर्मादाय रुग्णालयातील आरक्षित खाटा निर्धन व दुर्बल घटकांतील रुग्णांसाठी उपलब्ध करून देण्याबाबतच्या योजनेच्या प्रभावी अंमलबजावणीसाठी खालीलप्रमाणे सूचना निर्गमित करण्यात येत आहेत:-

१) धर्मादाय आयुक्त, महाराष्ट्र राज्य यांनी धर्मादाय आयुक्तांच्या अंतर्गत विभागनिहाय स्वतंत्र व Dedicated अधिकाऱ्यांची नेमणूक करावी. सदर अधिका-यांना निर्धन रुग्ण निधी (IPF) खाते तपासण्याचे अधिकार प्रदान करण्यात येत आहेत.

२) केंद्र आणि राज्य शासनाच्या आरोग्य विषयक विविध योजना सर्व धर्मादाय रुग्णालयात लागू करण्यात याव्यात. त्यासाठी संबंधित विभागांकडे प्रस्ताव सादर करण्यात यावा.

३) धर्मादाय आयुक्त कार्यालयामार्फत सर्व धर्मादाय रुग्णालयात माहिती फलक दर्शनीय भागात लावण्यात यावे, जेणेकरून नागरिकांना सर्व माहिती स्पष्टपणे कळेल. तसेच, यामध्ये धर्मादाय रुग्णालय मदत कक्षाची माहिती नमूद करावी, जेणेकरून पारदर्शकता वाढेल. तसेच या फलकामुळे रूग्णांच्या नातेवाईकांना रिक्त खाटांची स्थिती, रूग्णालयात कार्यरत शासकीय योजना आणि इतर माहिती मिळण्यास मदत मिळेल. सदर अद्ययावत माहिती सर्वांना उपलब्ध होण्यासाठी “ऑनलाईन प्रणालीवर” व “डॅशबोर्डवर” दर्शविण्यात यावी.

४) स्थानिक महापालिका क्षेत्रात जागा आणि इतर सवलती घेणाऱ्या आणि केंद्र /राज्य शासनाकडून/जिल्हाधिकारी कार्यालयाकडून जमीन सवलत घेणाऱ्या रुग्णालयाची यादी संबंधित विभागांनी तयार करावी व सदर यादी विधि व न्याय विभागास सादर करावी.

५) सदर योजनेच्या अंमलबजावणीस टाळाटाळ करणा-या तसेच योजनेच्या अंमलबजावणीसाठी तयार करण्यात आलेल्या ऑनलाईन प्रणालीचा वापर करण्यास टाळाटाळ करणा-या धर्मादाय रुग्णालयांवर महाराष्ट्र सार्वजनिक विश्वस्तव्यवस्था अधिनियम १९५० तसेच मा.उच्च न्यायालय, मुंबई यांच्या रिट याचिका (पीआयएल ) क्र.३१३२/२००४ मधील न्यायालयीन निर्णयानुसार तयार करण्यात आलेल्या योजनेच्या अनुषंगाने योग्य ती कारवाई करण्यात यावी.

६) धर्मादाय रुग्णालयांकडून निर्धन व दुर्बल घटकातील किती रुग्णांना उपचार देण्यात आले याबाबत प्राप्त होणारे मासिक अहवाल रुग्णालयांनी तसेच धर्मादाय आयुक्त कार्यालयाने सार्वजनिक अधिक्षेत्रावर (Public Domain) वर उपलब्ध करून द्यावेत.

७) महाराष्ट्र वैद्यकीय परिषद (MMC) यांनी धर्मादाय रुग्णालयातील डॉक्टरांना स्पष्ट निर्देश द्यावेत की, त्यांनी धर्मादाय रुग्णालयात निर्धन व दुर्बल घटकातील रुग्णांची तपासणी व उपचार करण्यास टाळाटाळ करू नये.

८) सर्व धर्मादाय रुग्णालयांनी एकच निर्धन रुग्ण निधी (IPF) चे खाते उघडावे. तसेच एखाद्या रुग्णालयात एकापेक्षा जास्त निर्धन रुग्ण निधीचे खाते असल्यास त्यांनी एकाच खात्याचा वापर सदर प्रयोजनासाठी करावा व इतर निर्धन रुग्ण निधी (IPF) चे खात्यातील रक्कम एकाच खात्यात जमा करावी. सर्व धर्मादाय रुग्णालयांच्या निर्धन रुग्ण निधीबाबत केंद्रीकृत (Centralised) यंत्रणा निर्माण करून त्यामार्फत सदर निधीबाबतचे नियंत्रण धर्मादाय आयुक्त कार्यालयाकडून करण्यात यावे.

९) निर्धन व दुर्बल घटकातील रुग्णांच्या आर्थिक दर्जा संबंधी लाभार्थी रुग्णांनी (१) तहसिलदार उत्पन्न प्रमाणपत्र (२) शिधापत्रिका / दारिद्रय रेषेखालील पत्रिका ३) पॅन कार्ड (उपलब्ध असल्यास) यापैकी एक कागदपत्र रुग्णालयास दाखल करणे आवश्यक आहे. त्यानुसार तहसिलदार

यांच्याकडून कुटुंबाच्या उत्पन्नाचे प्रमाणपत्र देण्यात येते. तथापि, रुग्णालयांकडून उत्पन्नाचे प्रमाणपत्राबाबत तक्रारी करण्यात येत आहेत. सबब, महसूल व वन विभागामार्फत तहसिलदार यांना निर्धन व दुर्बल घटकातील रुग्णांच्या उत्पन्नाची तपासणी करून उत्पन्नाचे प्रमाणपत्र देण्याचे निर्देश देण्यात यावेत.

१०) धर्मादाय रुग्णालयांची तपासणी करण्यासाठी तपासणी समिती गठीत करण्यात यावी.

११) धर्मादाय रुग्णालयांमध्ये १८६ धर्मादाय आरोग्य सेवकांच्या सेवा बाह्ययंत्रणेद्वारे घेण्यास मान्यता देण्यात आली आहे. सदर पदे तात्काळ भरण्यात यावीत.

१२) धर्मादाय रूग्णालयातील आरक्षित खाटा निर्धन व दुर्बल घटकातील रूग्णांसाठी नियोजित उपचार/शस्त्रक्रिया याकरीता उपलब्ध करुन देण्यासाठी सर्व धर्मादाय रुग्णालयांनी ऑनलाईन प्रणालीद्वारे मंत्रालयातील "धर्मादाय रुग्णालय मदत कक्षाची" पूर्वमान्यता घेण्यात यावी. त्याचप्रमाणे आपत्कालीन परिस्थितीमध्ये या योजनेअंतर्गत धर्मादाय रुग्णालयांनी प्रथम संबंधित रुग्ण तातडीने भरती करुन घेवून त्यावर उपचार करावेत व त्याबाबत ऑनलाईन प्रणालीवर नोंद घेवून पुढील ४८ तासात प्रस्ताव मान्यतेसाठी मंत्रालयातील धर्मादाय रुग्णालय मदत कक्षामध्ये ऑनलाईन प्रणालीमध्ये कार्योत्तर मंजूरीसाठी पाठवावा. यासंदर्भात सर्व धर्मादाय रुग्णालयांना सूचना देण्यात याव्यात.

१३) धर्मादाय रुग्णालयांकडून निर्धन व आर्थिक दृष्टया दुर्बल घटकांतील रुग्णांसाठी आरक्षित खाटा ठेवण्याबाबतच्या योजनेच्या अंमलबजावणीबाबतचा विषय विधि व न्याय विभागाकडून हाताळण्यात येत असल्याने या विषयाबाबत विधि व न्याय विभागाच्या पूर्वमान्यतेशिवाय कोणतीही कार्यवाही करण्यात येवू नये.

१४) धर्मादाय रुग्णालय मदत कक्षास उपलब्ध करून देण्यात आलेल्या टोल फ्री क्रमांकास (१८००१२३२२११) केंद्र व राज्य शासनाच्या सर्व आरोग्यविषयक योजना लिंक करण्यात याव्यात.

१५) धर्मादाय रुग्णालयांनी बँकेत नवीन सर्वसाधारण तसेच निर्धन रुग्ण निधी खाते (IPF) उघडल्यास त्याबाबत धर्मादाय आयुक्त यांच्या कार्यालयास कळविण्यात यावे.

१६) धर्मादाय रुग्णालयात आरक्षित खाटासंदर्भात तयार करण्यात आलेल्या योजनेची तसेच ऑनलाईन प्रणालीच्या प्रसिध्दीसाठी आवश्यक कार्यवाही करण्यात यावी.

३. उपरोक्त सूचना संबंधितांच्या निदर्शनास आणुन देण्याची तसेच सूचनांनुसार आवश्यक कार्यवाही करण्याची दक्षता धर्मादाय आयुक्त कार्यालयाने घ्यावी.

४. सदर शासन परिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आले असून त्याचा संकेताक २०२५०६१०१२३४५३४२१२ असा आहे. हे शासन परिपत्रक डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

VILAS SHIVAJI KHANDBAHALE

Digitally signed by VILAS SHIVAJI KHANDBAHALE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=LAW AND JUDICIARY DEPARTMENT,
2.5.4.20=17f78c202c2c5af679d01b6be0d00a6c3c4097df58c7aef51840198654fef2a2, postalCode=400032, st=Maharashtra,
serialNumber=A107E66E98674C97AEE36AEB40218E5733867BDF79135D94410C8672550E4AF9, cn=VILAS SHIVAJI KHANDBAHALE
Date: 2025.06.10 12:35:47 +05'30'

**( विलास खांडबहाले )**

**उप विधि सल्लागार नि उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१) मा.राज्यपाल यांचे सचिव, राज्यपाल सचिवालय, राज भवन, मलबार हिल, मुंबई.
२) मा.सभापती, महाराष्ट्र विधानपरिषद, मुंबई यांचे सचिव, विधान भवन, मुंबई.
३) मा.अध्यक्ष, महाराष्ट्र विधानसभा, मुंबई यांचे सचिव, विधान भवन, मुंबई.
४) मा.मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई.
५) मा.उप मुख्यमंत्री (नगर विकास) यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई.
६) मा.उप मुख्यमंत्री (वित्त) यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई.
७) सर्व मा. मंत्री/मा. राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
८) मा.विरोधी पक्षनेता, महाराष्ट्र विधानपरिषद, मुंबई यांचे सचिव, विधान भवन, मुंबई.
९) मा.विरोधी पक्षनेता, महाराष्ट्र विधानसभा, मुंबई यांचे सचिव, विधान भवन, मुंबई.
१०) सर्व मा. विधानमंडळ सदस्य, विधानभवन, मुंबई.
११) मा.मुख्य सचिव यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई.
१२) सर्व अ.मु.स. / प्रधान सचिव / सचिव, मंत्रालय, मुंबई.
१३) धर्मादाय आयुक्त, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
१४) कक्ष प्रमुख, धर्मादाय रुग्णालय मदत कक्ष, ७ वा मजला, मंत्रालय, मुंबई
१५) उप सचिव (ड-२०), महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई.
१६) सर्व धर्मादाय सह आयुक्त / उप आयुक्त, (धर्मादाय आयुक्त कार्यालयामार्फत).
१७) सर्व सहायक धर्मादाय आयुक्त (धर्मादाय आयुक्त कार्यालयामार्फत).
१८) सर्व जिल्हाधिकारी.
१९) सर्व धर्मादाय रुग्णालये (धर्मादाय आयुक्त कार्यालयामार्फत).
२०) प्रबंधक, महाराष्ट्र वैद्यकीय परिषद, मुंबई.
२१) महालेखापाल १, (लेखा परीक्षा / लेखा व अनुज्ञेयता ) मुंबई.
२२) महालेखापाल २, (लेखापरीक्षा / लेखा व अनुज्ञेयता ) नागपूर.
२३) निवडनस्ती (का.१५).